**दि कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा.लि. कुमरी , ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर या संस्थेला राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेतंर्गत शासनाच्या भागभांडवलाची रक्कम मंजूर करण्याबाबत. (कोल्हे कमिटी)**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-११२००१/प्र.क्र.४०/९-स,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २३ ऑगस्ट, २०१०.**

**वाचा :-** १) रा. स. वि. नि. नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:1-2/2001-PC (125) , दि.५.१२.२००१.
२) शासन निर्णय क्रमांक प्रक्रिया-११२००१/प्र.क्र.४०/९-स, दि.३०.३.२००२.
३) शासन निर्णय क्रमांक प्रक्रिया-११२००१/प्र.क्र.४०/९-स, दि.२२.७.२००२
४) शासन निर्णय क्रमांक प्रक्रिया-११२००१/प्र.क्र.४०/९-स, दि.१३.२.२००४
५) शासन निर्णय क्रमांक प्रक्रिया-११२००१/प्र.क्र.४०/९-स, दि.२३.८.२००४

**प्रास्ताविक :-**

**दि. कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा. लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेमार्फत काजू प्रक्रिया करण्याचा प्रकल्प उभारण्यात येत असून त्यानुषंगाने **दि कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा. लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेचा रू.३९५.०० लाख किंमतीचा काजू प्रक्रिया प्रकल्प नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने दि.३०.०५.२००१ च्या शासन पत्रान्वये राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडे अर्थसहाय्यासाठी शिफारस करण्यात आला होता. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने त्यांच्या दि.०५.१२.२००१ च्या मंजूरी आदेशान्वये रू.३९५.०० लाख एवढी प्रकल्प किंमत ग्राह्य धरून सदर संस्थेला खालील आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य मंजूर केलेले आहे.

(**रूपये लाखात**)

| अ. क्र. | बाब | प्रकल्प किंमतीच्या प्रमाणात अर्थसहाय्याची टक्केवारी | रूपये लाखात. |
|---|---|---|---|
| १ | राष्ट्रीय सहकारी विकास निगमाचे कर्ज. | ६०% | २३७.०० |
| २ | राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून राज्य शासनास गुंतवणुक कर्ज व राज्य शासनाकडून संस्थेस भाग-भांडवल. | २०% | ७९.०० |
| ३ | शासनाचे स्वनिधीतून भागभांडवल. | १०% | ३९.५० |
| ४ | संस्थेचे स्वभागभांडवल | १०% | ३९.५० |
| | **एकूण :-** | **१००%** | **३९५.००** |

वरील आकृतीबंधात नमूद केल्यानुसार संस्थेने सभासदांकडून १० टक्के रक्कम स्वभागभांडवल म्हणून जमा केलेली आहे. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने संस्थेस मंजूर केलेल्या अर्थसहाय्यानुसार शासनामार्फत वितरीत केलेल्या अर्थसहाय्याचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र** | **शासन निर्णय व दिनांक** | **निगमाचे कर्ज** | **निगमाचे भागभांडवल** | **शासकीय भागभांडवल** |
|---|---|---|---|---|
| **१.** | **प्रक्रिया११२००१/प्र.क्र.४०/९स, दि.३०.०३.२००२** | **०.००** | **७९.००** | **०.००** |
| **२** | **प्रक्रिया११२००१/प्र.क्र.४०/९स, दि.२२.०७.२००२** | **५९.२५** | **०.००** | **०.००** |
| **3** | **प्रक्रिया११२००१/प्र.क्र.४०/९स, दि.१३.०२.२००४** | **५०.००** | **०.००** | **०.००** |
| **४** | **प्रक्रिया११२००१/प्र.क्र.४०/९स, दि.२३.०८.२००४** | **१२७.७५** | **०.००** | **०.००** |
| | **एकूण** | **२३७.००** | **७९.००** | **०.००** |

त्यानुषंगाने **दि. कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा. लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेस राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने संस्थेस मंजूर केलेले शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) **रु.३९,५०,०००/- (अक्षरी रुपये एकोण चाळीस लाख पन्नास हजार फक्त)** वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. याबाबतीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वरील आकृतीबंधात दर्शविण्यात आल्यानुसार **दि. कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा.लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेला निगमाची मंजूर प्रकल्प किंमत रु.३९५.००लाखाच्या १०% शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) **रु.३९,५०,०००/-(अक्षरी रुपये एकोण चाळीस लाख पन्नास हजार फक्त)** या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

भागभांडवल परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि.०५.१२.२००१ च्या मंजूरी आदेशाप्रमाणे व सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे राहतील.

या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **रु.३९,५०,०००/- (अक्षरी रुपये एकोण चाळीस लाख पन्नास हजार फक्त)** या रकमेचे आहरण करुन **दि. कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसा. लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेला वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय, पुणे यानां "आहरण व संवितरण अधिकारी" व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेली रक्कम जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरीत करण्याची कार्यवाही

आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन **रु.३९,५०,०००/- (अक्षरी रुपये एकोण चाळीस लाख पन्नास हजार फक्त)** चा धनादेश

**"दि कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसायटी लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर"**

**"THE KOKAN CO-OPERATIVE CASHEW MARKETING AND PROCESSING SOCIETY LIMITED , GADHINGLAJ , DIST., KOLHAPUR"**

या नांवाने काढण्यात यावा.

**दि कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसायटी लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर** या संस्थेस शासनाच्या आणि निगमाच्या कर्जाच्या / भागभांडवलाच्या नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा /बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील. त्याचप्रमाणे दि.३०.०३.२००२ च्या शासन निर्णयातील सर्व अटींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

वरीलप्रमाणे मंजूर केलेले शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) **रु.३९,५०,०००/- (अक्षरी रुपये एकोण चाळीस लाख पन्नास हजार फक्त)** चा खर्च **"मागणी क्र.व्ही-३ - ४४२५, - सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका (०२) सहकार संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना - (०२) (०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भागभांडवली अंशदान. (कोल्हे समिती) (राज्य योजना) (४४२५०७५९) ३२, अंशदाने"** या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबीकरिता करीत आहे. याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,**कोल्हापूर** यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, **कोल्हापूर** यांनी पणन संचालक, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यानंतर सादर करावा. जर या कामी संस्थेकडून कुचराई झाल्यास एकरकमी अर्थसहाय्याची रक्कम वसूल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. संस्थेचा प्रकल्प विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत संस्थेने योग्य ती काळजी घ्यावी.

या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाचा कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी.

**महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका , नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय नियंत्रक अधिका-याची आहे. तसेच दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्ययावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिका-याची आहे.या संदर्भातील सूचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.**

हे आदेश नियोजन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ **क्रमांक ४४५/१०/व्यय-२, दि.१५.०७.२०१०** अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१००८२३१४२१०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

sd/-
( ह. तु. जाधव )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,

०१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
०२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
०३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
०४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
०५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
०६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
०७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
०८. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टीटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११० ०१६.
०९. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे. रोड, पुणे-१
१०. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (रा.स.वि.निगमाच्या दि.२७.०१.२००९च्या मंजूरी आदेशासह)
१२. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय, मुंबई
१३. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/ (अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१४. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, **कोल्हापूर**
१५. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म. रा. पुणे-१
१६. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१७. कक्ष अधिकारी (२१-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. अध्यक्ष, दि कोकण को. ऑप. कॅश्यू मार्केटिंग अँड प्रोसेसिंग सोसायटी लि. कुमरी, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर.
१९. निवड नस्ती (९स)